**राज्यातील ऊसतोड कामगारांसाठी**
**"लोकनेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार**
**सामाजिक सुरक्षा योजना" राबविण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.असंका २०१८/प्र.क्र.१४/काम.७अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक - १९ ऑक्टोबर, २०१८.**

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यामध्ये साखर उद्योग हा एक प्रमुख उद्योग असून सद्यस्थितीमध्ये राज्यात कार्यरत सुमारे १०१ सहकारी क्षेत्रातील व ८७ खाजगी क्षेत्रातील साखर कारखान्यांमध्ये अंदाजे ८ लाख ऊसतोड कामगार या क्षेत्रात काम करतात. बहुतांश ऊसतोड कामगार हे मराठवाडा विभागातील व विशेषत: बीड जिल्ह्यातील असून राज्यातील विविध जिल्ह्यात स्थलांतरीत होऊन काम करतात.

ऊस तोडणी व वाहतूक खर्च कमाल मर्यादा निश्चित करण्याबाबतची कार्यवाही महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ लि., मुंबई व साखर कारखाना यांचेमार्फत करण्यात येते. ऊसतोड कामगारांना अपघाती विमा, झोपडी व बैलजोडी करिता विमा संरक्षण साखर कारखान्यांकडून देण्यात येते. ऊस तोडणी शेत मजूरास गंभीर मार लागल्यास मोफत रुग्णवाहिनीची व्यवस्था व दवाखान्याचा खर्च कारखान्याकडून करण्यात येतो. त्याचप्रमाणे कारखान्यामार्फत अल्प दरात वैद्यकीय सेवा व आरोग्यासाठी हंगामामध्ये मोफत रोग निदान शिबीर आयोजित करण्यात येते. जरी ऊस तोडणी कामगारांना महाराष्ट्र राज्य साखर कारखाना संघाच्या स्तरावरुन होणाऱ्या सामंजस्य करारानुसार मंजूरी व अन्य लाभ देण्यात येत असले तरीही ऊसतोड कामगारांना भविष्य निर्वाह निधी, कामगार राज्य विमा योजना, उपदान, नुकसानभरपाई, सानुग्रह अनुदान इत्यादी सामाजिक सुरक्षितता योजनेचे लाभ मिळत नाहीत. तसेच त्यांच्या पाल्यांना व कुटुंबियांना कोणतेही सामाजिक योजनांचे लाभ मिळत नाहीत. या ऊसतोड कामगारांचे व पर्यायाने त्यांच्या कुटुंबियांचे जीवन अस्थिर व अत्यंत हलाखीचे असल्यामुळे त्याचे जीवन सुखकारक करुन त्यांचे राहणीमान उंचावून आयुष्य स्थिर व सुरक्षित करण्यासाठी ऊसतोडणी व्यवसायातील असंरक्षित ऊसतोड कामगारांना कायद्याच्या कक्षेत आणून त्यांना विविध कल्याणकारी योजनांचा लाभ देण्यासाठीची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

यासंदर्भात दिनांक १०.१२.२०१७ रोजीच्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीमध्ये ऊस तोडणी कामगारांसाठी महाराष्ट्र माथाडी हमाल व श्रमजीवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९६९ या अधिनियमांतर्गत योजनांचा लाभ देणे अव्यवहार्य ठरत असल्यामुळे ऊसतोड कामगार व त्यांच्या कुटुंबियांना सामाजिक सुरक्षा

योजनांचा लाभ प्राप्त होण्याच्या दृष्टीने राज्यस्तरावर असंघटीत कामगार सामाजिक सुरक्षा अधिनियम, २००८ अंतर्गत सामाजिक सुरक्षा योजनेचा लाभ देण्याचा निर्णय घेतला आहे. मंत्रिमंडळाच्या निर्णयानुसार ऊसतोड कामगारांसाठी सामाजिक सुरक्षा व कल्याणकारी योजना राबविण्याचा शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## <u>शासन निर्णय</u> :-

केंद्र शासनाच्या असंघटीत कामगार सामाजिक सुरक्षा अधिनियम, २००८ अंतर्गत विशिष्ट योजनांचा लाभ देण्याकरिता महाराष्ट्रातील ऊसतोड कामगार व त्यांच्या कुटुंबियांकरिता "लोकनेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार सामाजिक सुरक्षा योजना" लागू करण्यात येत आहे.

या योजनेंतर्गत प्राथमिक टप्प्यामध्ये विविध प्रशासकीय विभागांच्या अंतर्गत सुरु असलेल्या घरबांधणी, वृद्धाश्रम व शैक्षणिक योजनांकरिता संबंधित प्रशासकीय विभागांनी ऊसतोड कामगार व त्यांच्या कुटुंबियांकरिता निधी उपलब्ध करुन देणे बंधनकारक आहे. यामधील घरबांधणी योजनेमध्ये इंदिरा आवास योजना, शबरी आवास योजना, प्रधानमंत्री आवास योजना, रमाई नागरी/ग्रामीण आवास योजना इ. योजनांचा प्रथम टप्प्यात समावेश करण्यात आला आहे. शैक्षणिक योजनेमध्ये विमुक्त जाती व भटक्या जातीकरिता शालेय शिक्षण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांचा समावेश करण्यात आला आहे. त्याचप्रमाणे सामाजिक न्याय विभागाच्या वृद्धाश्रम योजनेच्या निकषाप्रमाणे देखील लाभ देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

वरील लाक्षणिक योजनांव्यतिरिक्त ऊसतोड कामगारांसाठी सद्य:स्थितीत खालील योजना लागू करण्याचे प्रस्तावित आहे :-

- प्रधानमंत्री जीवन ज्योती विमा योजना
- प्रधानमंत्री सुरक्षा बिमा योजना
- अंत्यविधी अर्थसहाय्य योजना
- जीवन व अपंगत्व विमा छत्र
- आरोग्य व प्रसूतीलाभ
- वृद्धापकालीन संरक्षण
- केंद्र शासन निर्धारित करेल असे इतर लाभ
- भविष्य निर्वाह निधी
- कामाच्या ठिकाणी दुखापत झाल्यास अर्थसहाय्य योजना
- पाल्यांसाठी शिक्षण, हॉस्टेल फी परतावा व शिष्यवृत्ती सहाय्य
- कामगार कौशल्यवृद्धी योजना
- अंत्यविधी अर्थसहाय्य योजना
- वरील लाक्षणिक योजनांव्यतिरिक्त शासनास वेळोवेळी व गरजेनुसार उपयुक्त वाटणाऱ्या योजना

अंदाजे ८ लाख ऊसतोड कामगार व त्यांच्या कुटुंबियांपैकी १८ ते ५० वयोगटातील ७,२०,००० कामगार व त्यांच्या कुटुंबियांसाठी प्रधानमंत्री जीवन ज्योती विमा योजनेचा प्रिमियम रुपये १६५/- प्रमाणे एकूण रुपये ११,८८,००,०००/- खर्च अपेक्षित असून ५१ ते ५९ वयोगटातील ८०,००० कामगार व कुटुंबियांसाठी प्रधान मंत्री सुरक्षा विमा योजनेचा प्रिमियम रुपये ६/- प्रमाणे एकूण रुपये ४,८०,०००/- खर्च अपेक्षित आहे. तसेच अंत्यविधी अर्थसहाय्यासाठी रुपये ४,८०,००,०००/- खर्च अपेक्षित आहे. लोकनेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार कल्याणकारी योजनेकरिता वित्त विभाग व नियोजन विभागाच्या सहमतीने प्रथम टप्प्यामध्ये योजना सुरु करण्यासाठी रु.२० कोटी एवढा नियत व्यय उपलब्ध करून देण्यात येईल.

**अंमलबजावणी कल्याण केंद्र :**

शासन अधिसूचना दिनांक ३.४.२०१८ अन्वये महाराष्ट्र राज्य सामाजिक सुरक्षा नियम, २०१८ मधील तरतूदीनुसार मंडळ गठीत करण्यात आले आहे. त्याचप्रमाणे योजनेच्या अंमलबजावणीकरिता सद्यस्थितीत कामगार कल्याण केंद्र, परळी, (थर्मल पॉवर स्टेशन), जिल्हा बीड येथे सुरु करण्यात आलेल्या कार्यालयाद्वारे, तसेच सर्व विभागीय कामगार उप आयुक्त कार्यालये व त्यांनी निर्देशित केलेल्या कार्यालयांमार्फत पुढील कार्यवाही करण्यात येईल.

**नोंदणी :**

सदर कार्यालयामार्फत ऊसतोड कामगारांसाठी लोक नेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार कल्याणकारी योजनेकरीता ऊसतोड कामगारांची नोंदणी एका विशेष अभियानाद्वारे सुरु करण्यात येईल. सदर नोंदणी केंद्र शासनाने विकसित केलेल्या UWIN सॉप्टवेअरद्वारे आपले सरकार केंद्रामार्फत करण्याचे प्रस्तावित आहे.
नोंदणीसाठी आवश्यक कागदपत्रे खालीलप्रमाणे निश्चित करण्यात आली आहेत.

१. आधार कार्ड/शिधा पत्रिका/निवडणूक ओळखपत्र/PAN कार्ड

२. बँकेचे पासबुक

**ऊसतोड कामगारांसाठी विशेष अभ्यास गट :**

महाराष्ट्र राज्य सामाजिक सुरक्षा मंडळाच्या दिनांक ०४.०७.२०१८ रोजी झालेल्या पहिल्या बैठकीमध्ये विभिन्न असंघटीत व्यवसाय गटासाठी आवश्यकतेप्रमाणे अभ्यास गट नेमण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुषंगाने ऊसतोड कामगारांचे राहणीमान उंचावून आयुष्य स्थिर व सुरक्षित करण्यासाठी ऊसतोड कामगार विशेष अभ्यास गट शासन मान्यतेने गठीत करण्यात येईल. याबाबतचे सविस्तर आदेश यथावकाश काढण्यात येतील.

अभ्यास गटाची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील.

- महाराष्ट्र राज्य सामाजिक सुरक्षा मंडळानी सूचित केलेल्या विषयाबाबत अभ्यास करून अभिप्राय देणे
- ऊसतोड कामगारांसाठी सामाजिक सुरक्षा योजना प्रस्तावित करणे
- प्रस्तावित योजनेत, योजनेची व्याप्ती, लाभार्थी निवड करण्याची पद्धत, योजना राबविण्याकरिता निधीचे स्रोत, अंमलबजावणीची यंत्रणा, तक्रार निवारण पद्धती यांचा समावेश असावा.

उपरोक्त योजनांची अंमलबजावणी, नियंत्रण व समन्वय विकास आयुक्त (असंघटीत कामगार) यांचेमार्फत होईल. यासाठी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या अधिकारी व कर्मचारी यांच्या सेवांसंदर्भात या विभागाच्या शासन निर्णय क्र.रास्वावि २०१०/प्र.क्र.११/काम.८, दिनांक २९.५.२०१० अन्वये दिलेल्या अधिकारान्वये विकास आयुक्त (असंघटीत कामगार) हे नियंत्रक अधिकारी असतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०१९१७४६१५९२१० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dr.Shrikant L. Pulkundwar

Digitally signed by Dr.Shrikant L. Pulkundwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, serialNumber=c10a1e6c8fbe08c1180978bd3ed8a151ed05202d522b09b9960341c2f080906d, cn=Dr.Shrikant L. Pulkundwar
Date: 2018.10.19 17:49:28 +05'30'

**( डॉ.श्री.ल.पुलकुंडवार )**
**शासनाचे उप सचिव.**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र यांचे सचिव (पत्राने),
२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, अ-६, मंत्रालयासमोर, नरीमन पॉईंट, मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद, विधान भवन, मुंबई,
६. मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा.सर्व विधानसभा/विधान परिषद सदस्य, विधान भवन, मुंबई,
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,

९. मा.अप्पर मुख्य सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.मा.अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.मा.अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२.मा.अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३.मा.प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.मा.प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५.मा.सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६.मा.प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय यांचे स्वीय सहायक, मुंबई,
१७.कामगार आयुक्त, कामगार भवन, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१,
१८. आयुक्त (सहकार), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१९.विकास आयुक्त (असंघटीत कामगार), कामगार भवन, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१,
२०.साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे,
२१.सर्व जिल्हाधिकारी,
२२.सर्व सह/उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३.सर्व सह कामगार आयुक्त, कामगार भवन, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१,
२४.सर्व कामगार उप आयुक्त, कामगार भवन, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१,
२५.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
२६.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२७.सर्व अवर सचिव/कार्यासन अधिकारी, कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२८. निवड नस्ती/कार्यासन ७अ.